एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या चर्चगेट आवारात असलेल्या सर सीताराम तथा लेडी शांताबाई पाटकर दीक्षान्त सभागृहातील विद्युतीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बांधका-२०२३/प्र.क्र.५७/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ११ जुलै, २०२३.

**वाचा** :- १) कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई यांचे दि.२६.०६.२०२३ रोजीचे पत्र.

२) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९.

३) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९.

**प्रस्तावना** :- महाराष्ट्रामध्ये महिलांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहामध्ये आणण्यासाठी महर्षी धोंडो केशव कर्वे यांनी १९१६ मध्ये श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाची (देशातील पहिले महिला विद्यापीठ) स्थापना केली. या विद्यापीठाच्या माध्यमातून महिलांसाठी वेगवेगळ्या विद्याशाखा सुरु करुन महिलांना उच्च शिक्षण देण्यास सुरुवात केली. आज विद्यापीठाची संलग्नित महाविद्यालये महाराष्ट्रासह इतर सात राज्यांत पसरलेली आहेत. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाला ०५ जुलै, २०१६ रोजी १०० वर्षे पूर्ण झालेले आहेत. एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या चर्चगेट आवारात असलेल्या सर सीताराम तथा लेडी शांताबाई पाटकर दीक्षान्त सभागृहाची स्थिती फारसी चांगली नसल्याने, सभागृह विनावापर आहे. सबब, सभागृहातील विद्युतीकरणाची कामे करणे आवश्यक असल्याचे विद्यापीठाने कळविले आहे. सदरहू सभागृहाची दुरुस्ती तसेच विद्युतीकरणाची कामे केल्यावर या ठिकाणी विद्यापीठाचे विविध कार्यक्रम आयोजित करता येणार आहेत. सदरहू विद्युतीकरणाच्या कामाचे अंदाजपत्रक मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचेकडून तांत्रिक सहमती घेऊन संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासन मान्यतेस्तव सादर केले आहे.

सदर सभागृहाच्या विद्युतीकरणाच्या कामाची किंमत रु.१५ कोटीच्या मर्यादित असल्याने संदर्भाधिन क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या चर्चगेट आवारात असलेल्या सर सीताराम तथा लेडी शांताबाई पाटकर दीक्षान्त सभागृहाच्या विद्युतीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या चर्चगेट आवारात असलेल्या सर सीताराम तथा लेडी शांताबाई पाटकर दीक्षान्त सभागृहाच्या विद्युतीकरणाची कामे करण्यासाठी **रु.११,१४,१५७ -/ (अक्षरी रुपये अकरा लक्ष चौदा हजार एकशे सत्तावन्न फक्त)** इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

२. प्रस्तुत काम पुरात्तव विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

३. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

७. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, मुख्य लेखाशीर्ष २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२-विद्यापीठांना सहाय्य, (००) (३२) श्रीमती नाथीबाई दामोधर ठाकरसी विद्यापीठ, मुंबई यांचा विकास (२२०२ I ५८६), ३१ अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१२१२४१२०९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: CN = SHARAD SARJERAO KOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.07.12 12:43:33 +05'30'

**(शरद कोकाटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२) कुलगुरु, एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई.
३) प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग),यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) उपसचिव (विशि), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) कुलसचिव, एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई.
७) महालेखापाल, (लेखावअनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) महालेखापाल, (लेखापरीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८/१२) मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्रमांक: बांधका-२०२३/प्र.क्र.५७/विशि-२ दिनांक : ११ जुलै, २०२३ सोबतचे विवरणपत्र | | |
|---|---|---|
| एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या चर्चगेट आवारात असलेल्या सर सीताराम तथा लेडी शांताबाई पाटकर दीक्षान्त सभागृहातील विद्युतीकरणाची कामे करण्याबाबत... | | |
| ABSTRACT | | |
| Sr.No. | Name of Work | Amount Rs. |
| १. | Est.No.OW/C/HA/६२१५/२०२३-२४, Providing renovation to electrical installation at Sir Sitaram & Lady Shantabai Patkar Convocation Hall, SNDT Women◦s University, churchgate, Mumbai § ४०० ०२०. | ८,४०,६३५.०० |
| | Total Rs. | ८,४०,६३५.०० |
| | Add Contigency @ ४% | ३३६२५.४ |
| | Total Rs. | ८,७४,२६०.४ |
| | Add GST @ १८% | १,५७,३६६.८७ |
| | Total Rs. | १०,३१,६२७.२७ |
| | Add Centage@ ८% | ८२,५३० |
| | Total Rs. | ११,१४,१५७.२७ |
| | Say Rs. | ११,१४,१५७.०० |
| In amount word Eleven lakh fourteen thousand one hundred fifty seven only | | |

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: CN = SHARAD SARJERAO KOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.07.12 12:43:54 +05'30'

(शरद कोकाटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन